**अधीक्षक अभियंता ( स्थापत्य ) पदावरील पदोन्नतीकरीता गट अ व गट ब मधील काम असणारी पदे निश्चित करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र .सेप्रनि- २०१५ /प्र.क्र.५०/आस्थापना -१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक – ३ जुलै, २०१५

<u>वाचा</u> -: १) शासन अधीसूचना, क्र. आरटीआर-१०८०/(२०३)/आस्थापना- ३,दि. ९.६.१९८३.
२) शासन अधीसूचना,क्र. आरटीआर-१०८९/(११९४)/आस्थापना-१,दि. १४.८.१९८९.

**शासन निर्णय :-**

कार्यकारी अभियंता ( स्थापत्य ) पदावरुन अधीक्षक अभियंता ( स्थापत्य ) पदावर, वरील संदर्भाधीन सेवाप्रवेश नियम, १९८३ व सुधारीत सेवाप्रवेश नियम, १९८९ मधील तरतूदीनुसार पदोन्नती देण्यात येते. सेवा प्रवेश नियमातील तरतूदीनुसार संबंधीत कार्यकारी अभियंत्यांनी गट अ व गट ब मधील पदावर केलेल्या कामकाजाचा अनुभव निश्चित होणे आवश्यक आहे. या अनुषंगाने आकृतिबंधानुसार मंजूर पदे आणि प्रतिनियुक्तीवरील पदे यामधील गट अ व गट ब मधील काम असणारी पदे निश्चित करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे. :-

| | | |
|---|---|---|
| सचिव (रस्ते) | - | अध्यक्ष |
| सचिव ( बांधकामे ) | - | सदस्य |
| सह सचिव ( सं.नि.) | - | सदस्य |
| मुख्य अभियंता ( मुंबई ) | - | सदस्य |
| उप सचिव ( सेवा) | - | सदस्य |
| अवर सचिव ( सेवा ) | - | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील :-

१) सदर समिती विभागातील नियमित पदे त्याचप्रमाणे इतर विभागात प्रतिनियुक्तीची पदे, ही गट अ किंवा गट ब मधील आहेत, हे ठरविल.

२) सदर समिती कार्यकारी अभियंता पदावरुन अधीक्षक अभियंता पदावर पदोन्नतीचा प्रस्ताव आस्थापना मंडळास सादर करण्यापूर्वी संबंधित कार्यकारी अभियंता यांचा गट अ व गट ब मधील सेवेचा /अनुभवाचा कालावधी ठरविल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०७१३०५०४२५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने .

Sulbha Narendra Pore

Digitally signed by Sulbha Narendra Pore
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sulbha Narendra Pore
Date: 2015.07.07 13:07:02 +05'30'

( सु.न.पोरे )
कार्यासन अधिकारी

**प्रत**, अग्रेषित,

१) अ.मु.स. (सा.बां.वि.) यांचे स्वीय सहायक,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई.
२) सचिव ( रस्ते ),सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई.
३) सचिव ( बांधकामे ), सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालय, मुंबई.
४) सह सचिव ( सं.नि. ), सार्वजनिक बांधकाम विभागम , मंत्रालय, मुंबई.
५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
६) उप सचिव ( सेवा ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई.
७) अवर सचिव ( सेवा ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई.
८) अवर सचिव ( सं.नि. ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई.
९) कार्यासन आस्थापना - १ / सेवा - १, सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय ,मुंबई